**महाराष्ट्र विकास सेवा गट-अ , गट विकास अधिकारी संवर्गातील अधिकारी यांना पदस्थापना देण्याबाबत.**

**महाराष्ट्र शासन**
**ग्राम विकास विभाग**
शासन आदेश क्रमांक : मविसे-१०२४/प्र.क्र.७०/२०२४/आस्था-३,
बांधकाम भवन, २५, मर्झबान पथ, मुंबई - ४०० ००१.
दिनांक:- १० जून, २०२४

वाचा:-ग्राम विकास विभाग,आदेश क्र.मविसे-५५२३/प्र.क्र.९९/आस्था-२, दिनांक ७ मार्च,२०२४.

**शासन आदेश :-**

सार्वजनिक सेवेच्या हितार्थ महाराष्ट्र शासकीय कर्मचाऱ्यांच्या बदल्यांचे विनियमन आणि शासकीय कर्तव्ये पार पाडताना होणाऱ्या विलंबास प्रतिबंध अधिनियम , २००५ मधील कलम ४(४) व ४(५) मधील तरतूदींनुसार, उपरोक्त वाचा येथील दिनांक ७ मार्च,२०२४ रोजीच्या आदेशान्वये श्री.विठ्ठल शामराव जाधव, गट विकास अधिकारी यांचे निलंबन संपुष्टात आणून त्यांना पुन:स्थापित करण्याबाबत निलंबन आढावा समितीने घेतलेल्या निर्णयाच्या अनुषंगाने नागरी सेवा मंडळाने केलेल्या शिफारशीस अनुसरून व बदली करण्यास सक्षम असलेल्या प्राधिकाऱ्यांच्या मान्यतेने महाराष्ट्र विकास सेवा,गट-अ, गट विकास अधिकारी संवर्गातील श्री.विठ्ठल शामराव जाधव, गट विकास अधिकारी यांचे पदस्थापनेचे शासन आदेश देत आहे. संबंधित अधिकाऱी यांची पदस्थापना त्यांच्या नावासमोरील स्तंभ क्र . ३ मध्ये दर्शविलेल्या पदावर करण्यात येत आहे :-

| अ. क्र. | अधिकाऱ्याचे नाव, सध्या धारण केलेले पद | पदस्थापनेचे पद व ठिकाण | शेरा |
|---|---|---|---|
| (१) | (२) | (३) | (४) |
| १. | श्री.विठ्ठल शामराव जाधव,<br>गट विकास अधिकारी,<br>(नियुक्तीशिवाय) | प्रकल्प संचालक, जल जीवन मिशन, जिल्हा परिषद, वर्धा | रिक्त पदी |

२. सदर आदेश तात्काळ अंमलात येत असून, श्री.जाधव यांनी पदस्थापना दर्शविण्यात आलेल्या पदावर तात्काळ रूजू व्हावे.

३. संबंधित विभागीय आयुक्त / मुख्य कार्यकारी अधिकारी यांनी सदर आदेशाची तात्काळ अंमलबजावणी करून श्री.जाधव यांना पदस्थापनेच्या पदावर रूजू करून घ्यावे व अनुपालन अहवाल

शासनास उलट टपाली सादर करावा. संबंधित अधिकारी यांनी अनधिकृत रजेवर जाऊ नये. त्यांचे लक्ष सामान्य प्रशासन विभागाच्या क्रमांक : सीडीआर १०८२/२५६७/२८/अकरा, दिनांक ३०.८.१९८२ च्या परिपत्रकाकडे वेधण्यात येत आहे. त्यात दिलेल्या सूचना लक्षात घेऊन बदली रद्द करण्यासाठी कुठल्याही स्वरुपाची आवेदने सादर केल्यास, ते शिस्तभंगाच्या कारवाईस पात्र ठरतील याची त्यांनी नोंद घ्यावी.

४. सदर शासन आदेश महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संगणक संकेतांक २०२४०६१०१५५५०७६१२० असा आहे. हा आदेश डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन निर्गमित करण्यात येत आहे .

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने,

DR.URMILA VAIBHAV JOSHI

Digitally signed by DR.URMILA VAIBHAV JOSHI
DN: c=IN, o=GOVERNMENT OF MAHARASHTRA, ou=RURAL DEVELOPMENT DEPARTMENT, 2.5.4.20=0a6ce46aedb9acea34c72711d852d8e2e71e76603f9082ea9709649c6f45dc30, postalCode=400032, st=Maharashtra, serialNumber=713D6BDDB988B05B1CC072EBFD3A58E7E640EA20499573AAE08DC106AC632ADD, cn=DR.URMILA VAIBHAV JOSHI
Date: 2024.06.10 19:02:56 +05'30'

**( डॉ.उर्मिला जोशी )**

**अवर सचिव, महाराष्ट्र शासन**

**प्रत,**

१) मा. मुख्यमंत्री, महाराष्ट्र राज्य यांचे खाजगी सचिव, मंत्रालय, मुंबई,
२) मा. उपमुख्यमंत्री ,महाराष्ट्र राज्य यांचे खाजगी सचिव,मंत्रालय, मुंबई,
३) मा. मंत्री ( ग्राम विकास) यांचे खाजगी सचिव, मंत्रालय, मुंबई,
४) प्रधान सचिव (ग्राम विकास व पंचायत राज) यांचे स्वीय सहायक,फोर्ट, मुंबई.
५) विभागीय आयुक्त, अमरावती व नागपूर विभाग.
६) महालेखापाल - १/२ (लेखा परीक्षा / लेखा व अनुज्ञेयता) महाराष्ट्र, मुंबई / नागपूर
७) मुख्य कार्यकारी अधिकारी, जिल्हा परिषद, वर्धा व यवतमाळ,
८) अवर सचिव,पाणी व स्वच्छता विभाग, मुंबई.
९) जिल्हा कोषागार अधिकारी, वर्धा व यवतमाळ,
१०) संबंधित अधिकारी (संबंधित विभागीय आयुक्त / मुख्य कार्यकारी अधिकारी यांचेमार्फत.),
११) अवर सचिव,आस्था-२, ग्राम विकास विभाग, मर्झबान पथ, फोर्ट, मुंबई.
१२) निवड नस्ती (कार्यासन, आस्था-३), ग्राम विकास विभाग,मर्झबान पथ, फोर्ट, मुंबई.